


"**शहीद जवान**" या ई-पुस्तक रसिकांच्यासाठी सादर करताना अत्यंत आनंद होत आहे...

महाराष्ट्रातील मान्यवर नवकवी हे विविध प्रकारचे लिखाण करीत आहेत, त्यावर त्यांचा अभ्यासही चालू आहे, त्याच्या या प्रयत्नांना हातभार लागावा म्हणून आम्ही **ई-बुक साप्ताहिक** स्वरूपात त्यांचे साहित्य आपल्यासाठी घेऊन आलो आहोत.. आपल्याला आवडतील अशा प्रकारच्या दर्जेदार काव्यरचना वाचायला मिळतील, याची खात्री आम्ही देतो...

कवी/कवयित्री यांनी ज्या काव्यरचना आम्हाला पाठविण्यात आल्या आहेत त्या त्यांनी स्वतः लिहिलेल्या आहेत, जर कोणाला काव्यरचनेवर आक्षेप असेल तर,
त्यांनी bhargavidesign@gmail.com वर आम्हला सूचित करावे..

धन्यवाद,
**भार्गवी डिजाईन स्टुडिओ**



# सहभाग

| नं | कवितेचे शीर्षक | कवी/कवयित्री |
|---|---|---|
| १ | जवान | सौ. जया वि. घुगे-मुंडे |
| २ | बहुमान | सौ. मनाली प्रदीप कोनकर |
| ३ | शहीद जवान | सौ. सोनाली जगताप |
| ४ | शहीद जवान | सौ. रेणुका पांचाळ |
| ५ | सर्वस्व देशासाठी | श्री. संजय वि. जाधव |
| ६ | जय जवान | सौ. वृंदा दीपक राव |
| ७ | शहीद जवान | श्री. राजीव देशमुख |
| ८ | वीरा तुजसी प्रणाम | श्री. विशाल एस. नवले |
| ९ | शहिद जवान | कु. सौरभ एच. आहेर |
| १० | सैनिका तुझी गाथा | सौ. वैभवी मराठे |
| ११ | शहीद जवान | कु. पवनकुमार कांबळे |
| १२ | वीर सैनिक | श्री. अरविंद कुलकर्णी |
| १३ | स्वाभिमान | सौ. शामला पंडित (दीक्षित) |
| १४ | शहिद जवान | सौ. श्रद्धा शि. खानापूरकर |
| १५ | आम्ही शूर सुपुत्र | सौ. सरोज सु. गाजरे |
| १६ | वीर मातेचे वीर जवान | कु. योगेश देवरे |
| १७ | वीरगती | सौ. मनीषा दि. सामनेरकर |
| १८ | शूर माझा बाळ | सौ. अंजली उत्तरवार |
| १९ | वीर जवान | कु. सिद्धेश दि. उतेकर |
| २० | आठवतो पुलवामा हल्ला | सौ. रेखा बागुल |
| २१ | शहीद जवान | सौ. सविता मुनोत |
| २२ | वीरगती | ॲड. वर्षा जाधव |
| २३ | २६/११ ची ती भयाण रात | कु. अक्षय च. सितापुरे |
| २४ | वीर जवान | कु. प्रशांत अ. गोरे |
| २५ | वीरगती | सौ. संगीता महाजन |
| २६ | शहीद जवान | कु. मयूर बागुल |
| २७ | सैनिकहो तुमच्यासाठी | श्री. सागर डवरी |
| २८ | जवानांना मानवंदना | सौ. रोहिणी टाकळकर-जोशी |
| २९ | लाल धरणी | सौ.अर्चना सुनिल घळके |
| ३० | ढाल | सौ.दिपाली दिलीप पिंपळे |
| ३१ | शहीद जवान | श्री. प्रसाद सु. धुमाळ |

# जवान

भारतमाता ऋणात ज्याच्या
युगानुयुगे नांदते आहे,
या देशाचा रक्षक खरोखर
फक्त इथला जवानच आहे...

प्राणाची न पर्वा करता
ताठ सदैव ज्याची मान,
गुण्यागोविंदाने आपण कारण
सिमेवर ऊभा असे जवान..

नाती-गोती सोडून सारीच
मैलोनमैल जात असतो,
अंतःकरणात सल दडवून
बंदूक उराशी कवटाळतो...

मन जाते भारावून इतके की
अफाट देशप्रेमाचा एकमेव धनी,
या वीरांच्या नित्य स्मरणात
सद्भावना ठेवूयात मनी.....

जोपर्यंत सिमेवर ऊभा जवान
कृतीतून देशप्रेम दावतो,
तोपर्यंत ही सुरक्षित भारतमाता
कोणी न वाकडी नजर करतो...

✒ **श्रीम. जया वि. घुगे-मुंडे**



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



**श्रीम. जया वि. घुगे-मुंडे**
परळी वैजनाथ,बीड



काव्य
वृंदावन
ई-बुक साहित्य

# बहुमान

सप्त रंग सोडून तीन रंगांमध्ये
स्वप्नं माझे सजवले
बघुनी तिरंगा तुझ्या हातामध्ये
चालले सोबत  सात पावले

कोण म्हणेल मज लंकेची पार्वती
सजवलेस तू मला तव पदकांनी
हीच तुझ्या शौर्याची पावती
मिळवलीस ती तू  स्वकर्तृत्वानी

नको काळजी या काळजाची
सांभाळलेस तू आपुले वतन
नाही पडणार मोडून
देते बघ मी तूला वचन

लढलास तू प्राणपणाने
व्यर्थ न गेले तुझे बलिदान
सांगेन मी अभिमानाने
मिळाला मज वीरपत्नीचा बहुमान

**मनाली प्रदीप कोनकर**

कवयित्री



**मनाली प्रदीप कोनकर**
पेण, जिल्हा रायगड

# शहीद जवान

देशाचे रक्षण करी सैनिक
उन असो अथवा पाऊस
न ढळे कधीच निश्चय
नित्य लक्ष असे चहूस...१

आपणांस निवांत क्षण लाभले
त्याच्याच मुळे प्रत्येकासमान
वंदना देते सैनिकांना
लढतात भारतीयांच्या हक्कास...२

बर्फ हिमालयात हूडहूडी
थिजते अंग अंग खूप
जाणीव ठेवा प्रत्येकाने
खाली महासागराचे मुख...३

शस्त्र अस्त्रांनी असे सज्ज
प्रत्येक सैनिकात हत्तींचे बळ
कुठूनही होतात वार प्रहार
शत्रूचे उध्वस्त करी तळ...४

जमीन समुद्र असो अथांग
चारी बाजूंनी तट हवाई मार्ग
जाणून घ्या आहुति चे मर्म
धरतीवर फुलवीतो स्वर्ग...५

**सोनाली जगताप**



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



सोनाली जगताप
बांद्रा, मुंबई



# शहीद जवान

भारत भूचे सुपुत्र आम्ही
रक्षक होऊन लढणार
त्रास होतो मायभूमीला
युद्ध आम्ही करणार

तीरंगी झेंडा लहरत ठेवू
आम्ही लेकरे जयगीते गाऊ
वंदन करूनी भारत भूला
सदैव आम्ही मानाने ठेवू

बंदूक घेऊन हातामध्ये
पहारा करू देश रक्षिण्यासाठी
शहीद झालो जरी लढता लढता
तरी दुःख ना देहासाठी

शहीद जवान म्हणून माझा
करील गौरव भारतमाता
मी देशाचा देश माझा
मनात उरली न खंत आता

प्रणाम करतो नमुन तुजला
माय भूमी ही भारतमाता
एकच नारा देत जाऊ
जय भारता जय भारता जय भारता

✒ रेणुका पांचाळ

काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



रेणुका पांचाळ
वसमत, जिल्हा हिंगोली

# सर्वस्व देशासाठी

जगलात तुम्ही सदैव
देशासाठी तनमनाने
सरहद्द हेच मानले घर
केला संसार बंदूकिशी इमानाने

राहिलात सदैव दूर
तुम्ही घरादारा पासुनी
केलंत कार्य अफाट
गाजवला पराक्रम उदार होऊनी

असे अभिमान मला
मी भाग्यवान तुमची
अर्धांगिनी करिते प्रार्थना सदोदित
करता निसिम्म सेवा देशाची

प्रेरणेने पाहतात सर्व
तुमच्या कर्तृत्वाकडे सारे
भाग्यवान मी म्हणूनी
मिळाले असे सौभाग्य खरे

विरपत्नी असल्याचा मला
असे सार्थ हो अभिमान
नेहमीच राहते गर्वाने
सदैव हो ताठ मान

राष्ट्रकार्यांची,राष्ट्रप्रेमाची
देशभक्तीची,समर्पणाची
विचारधारा जागविली तुम्ही
या लवकरी तयारी करते स्वागताची

✒ श्री.संजय विष्णु जाधव



काव्य
वृंदावन
ई-बुक साहित्य

कवी



श्री.संजय विष्णु जाधव
शहापूर, जिल्हा - ठाणे





कवयित्री



सौ.वृन्दा दीपक राव
धुळे.

# जय जवान

जय जवान जय हो
जवानांना नमस्कार
देशासाठी त्याची असे
त्यागभाव मोठी फार॥1॥

देशप्रेम ओतप्रोत
देशासाठी हा जगतो
शीर घेत तीरावर
देशासाठी तो लढतो॥2॥

ऊन की पाऊस असो
कधी तक्रार नसते
कर्तव्याची परिसीमा
जाण एकच असते॥3॥

नसे अपेक्षा कशाची
नसे मोह लोभ काही
डोळ्यामध्ये तेल घाली
सीमेवर नित्य पाही॥4॥

जाण ठेवा त्यांच्या अशा
सेवाभावी वृत्तीचीच
नाही मागत तरीही
द्यावी खूण आदराची॥5॥

गणवेशी जवान तो
प्रवासात भेटे जर
उभे राहूनिया करू
तया नमन सत्वर॥6॥

राहू कृतज्ञ कायम
त्यांच्याप्रति राहू ऋणी
त्यांची स्फूर्ती वाढवण्या
गाऊ त्यांची जयगाणी॥7॥

✒ सौ.वृन्दा दीपक राव

# विर जवान

समोर असतो तो दुश्मन,ना धर्म ना जाती,
एका हाती तिरंगा, बंदुक दुसऱ्या हाती !!

सीमेवर देशासाठी नेहमी सतर्क राहील,
आई यापुढे मी तुला भारत मातेतच पाहील !!

संपल्यावर काम माझं मी नक्की येईल,
कुशीत तुझ्या आल्यावर सगळं विसरून जाईल !!

आता ऐकु येत नाही ग तुझी अंगाई,
इथं फक्त तोफांचा आवाज आणि लढाई !!

एखादी गोळी जेंव्हा जवळुन जाते,
तेंव्हा तुझी खूप आठवण येते !!

नको करू काळजी आहे मी खुषीत,
तिथं तुझ्या मांडीवर, इथं भारत मातेच्या कुशीत !!

तुझी शप्पथ आई, लढतांना पाठ नाही दाखवणार,
दे वचन जर झालो शहीद तर तु नाही रडणार !!

✒ राजीव देशमुख



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवी



राजीव देशमुख
अकोला



# वीरा तुजसी प्रणाम

( अष्टाक्षरी )

देश रक्षण्या तत्पर
उभा सैनिक जवान
हात जोडुनी करतो
वीरा तुजसी प्रणाम ॥१॥

मातृभूमीसाठी झुंजे
प्राण त्यागतो आपले
शौर्य पराक्रमापुढे
जगी दुष्मन झुकले ॥२॥

तव कीर्तीचे दीपक
दाही दिशात पेटले
तुझ्यापुढे  यमानेही
बघ गुढगे टेकले  ॥३॥

वाघासम तु निडर
हिमालयापरी स्थिर
सुख सारे त्यागणारा
नाही होणे महावीर ॥४॥

मृत्यु करतो जवळ
गोळी झेले छातीवर
तुझ्यामुळे जीवनात
येई आमुच्या बहर ॥५॥

✒ विशाल एस. नवले " शिवकुमार "



कवी



विशाल एस. नवले
नांदुर जि. बुलढाणा

# शहीद जवान

धरणीही रडली होती ,
आभाळ हादरलं होतं..
भारत भुमीचं लेकरू,
आज शहीद झालं होतं...

बहिणीची ती राखीही
तेव्हा तुटुन पडली होती..
दुष्मनांची गोळी जेव्हा
काळजाला भिडली होती..

धारातिर्थी पडला वीर
घरदार आठवलं होतं..
मायभुमीचे रूप सारे,
हृदयात साठवलं होतं..

देह अंगणात होता आला
तिरंग्यात गुंडाळलं होतं..
ढसा ढसा रडली माय,
लेकाला कुरवाळलं होतं..

पुन्हा पोटी जन्मा येरे
माय एवढं बोलली होती..
स्वर्गातल्या देवांनीही
तिथे कवाडं खोलली होती...

✒ **सौरभ हिरामण आहेर**



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवी



**सौरभ हिरामण आहेर**
तिसगाव, नाशिक





कवयित्री



सौ.वैभवी मराठे
बोईसर जि. पालघर

# सैनिका तुझी कथा

देशेच्या परम सेवेकरिता,
उभे असतात सीमेवरी....
नाही करत स्वत:ची चिंता,
झेलतात गोळ्या छातीवरी....

सैनिक आहेत म्हणूनच,
जगतोय भारतीय आरामात....
चिंता करतात देशाची ते,
न अडकता कुठल्या नात्यात...

नसानसांत असे देशसेवा,
शत्रूंसाठी तर तू निखारा....
तुमच्या जीवाला चैन नसे,
कायम देतात सुरक्षेचा पहारा..

कडेकपारी डोंगर दऱ्यात,
झेलतात तुम्ही वादळ वारा....
रणरणत्या कडक वाळवंटात,
वाहतात घामाच्या धारा....

भावनेपेक्षा कर्तव्य श्रेष्ठ,
या उक्तिला मानणारा....
पराक्रमाचा ठसा उमटवूनी,
उद्यासाठी आज देणारा....

हे भारतीय सैनिका,
तुमच्या पराक्रमाची व्यथा...
कसे सांगू मी तुम्हाला,
थोडक्यात लिहिली ही कथा...

सौ.वैभवी मराठे

# शहीद जवान

लढले ते शूर वीर
भारत मातेच्या रक्षणासाठी
राहुनी घरापासून लांब सीमेवरती
फक्त आपुल्या भारत मातेसाठी,

सीमेवरती चकमक असते
नेहमीचीच सुरु
सैनिकांचे जिवन जाते
भारत मातेसाठी गुरू,

पाहते नेहमीच वाट ती आई
आपल्या भूमी पुत्राची
जेंव्हा बातमी कळते आपल्या
शाहिद झालेल्या जवानाची,

आसवं डोळ्यांतील पुसत ती म्हणते
आणखी एक मुलगा मज असता
तर त्यालाही भारत मातेच्या सुपुर्थ
मी केले असते,

त्यालाही भारत मातेच्या सुपुर्थ मी केले असते.........

✒ **पवनकुमार बाळकृष्ण कांबळे**





कवी



**पवनकुमार बाळकृष्ण कांबळे**
लातूर



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# वीर सैनिक

वंदन करतो तुला वीर सैनिका
जगणे तुझे असे मातृभूमीसाठी
वाकड्या नजरेने पाहता कुणी
तुझ्या कपाळावर पडते आठी

घरदार,मुलेबाळे हे तर सारे
सामान्य माणसाचे जगणे
तू आहेस असामान्य व्यक्ती
देशाच्या गौरवातच सारे शोधणे

देशाच्या सीमेवर तुम्ही असता
बिनधास्त मनाने भारतीय सारे
विजयी पताका फडकविता
आम्ही लावतो देशासाठी नारे

देवदुर्लभ भारतीय सैनिक
आम्हां आहे सार्थ अभिमान
तुमच्या कर्तृत्वामुळे सतत
वाढत आहे भारताचा सन्मान

आमच्या जगण्यापेक्षा तुमचे
वीरमरण जास्त गौरवशाली
कारण तुमच्या सोबत असतो
विश्वविजयी तिरंगा सभोवताली

अरविंद कुळकर्णी

कवी



अरविंद कुळकर्णी
मलकापूर जि. बुलढाणा

# स्वाभिमान

रक्त अर्पितो सैनिक,
जीवा उदार होवून
त्याग स्मरा अलौकिक,
नव चेतना लेऊन॥१॥
यशोगाथा स्वातंत्र्याची,
क्रांतीज्योत चेतवून
माथा टेकू चरणाशी,
पराक्रमा संस्मरून ॥२॥
तेज ज्वाला भडकावी,
विद्युल्लता कडाडून
दिव्य प्रभा झळकावी,
पराक्रम गाजवून ॥३॥
अधमांना तोडाफोडा,
उजळवा नभांगण
सन्मार्गाने घट्ट जोडा,
धर्मापलिकडे मन॥४॥
सदा नाहक अन्याय,
शत्रू सैनिकांकडून
वाचा फोडा न्यायासाठी,
तन मन धनातून॥ ५॥
अमंगल भेदाभेद,
उखडवा मूळातून
द्यावा साद प्रतिसाद,
मांगल्याची रुजवन ॥६॥
शिवबांची तलवार,
पराक्रम दाखवून
उधळले दरबार,
शिवशाही प्रस्थापून॥७॥
दिव्य जतन संस्कृती,
करा चिंतन मनन
स्वाभिमान सभोवती,
बिंबूद्यात कार्यातून॥ ८॥
उसळावे रक्तांतून,
देशप्रेम ओसंडून,
नायनाट परक्यांचा,
एकत्वला स्वीकारून ॥९॥
स्वाभिमान त्यांचा ठेवा,
वीर हुतात्मे तरुण
प्राण अर्पिले देशाला,
दिव्य स्वातंत्र्य देऊन॥१०॥

✒ **सो. शामला पंडित (दीक्षित)**





कवयित्री



**सो. शामला पंडित (दीक्षित)**
पूर्णानगर, चिंचवड



# शहीद जवान

तो देश,देश काय कुणी वीरांनी जन्म घेतला नाही
ते तारुण्य काय देशासाठी करण्याची हिंमत नाही
जो मुलगा,मुलगा काय ज्याला आईच्या दुधाची लाज नाही
काय हे जीवन फक्त जन्म घेणे व मरणे
जन्म घ्यावा असा की शुर बलवान झाले
मरा तर असे की जसे भगतसिंग शहीद झाले
जगा असे की रक्ता रक्तात काही निश्चय आहे
जीवन मिळून अमर व्हा जशी झाशीची राणी होती
अनेक शहीदानी छातीवर गोळ्या झेलल्या होत्या
तरी कुणाच्या चेहऱ्यावर दुःखाच्या रेषा नव्हत्या
तेही कुणाच्या तरी आईचे आवडते होते
बहिणीचे भाऊ होते,बायकोचे पती होते
ही भूमी अजूनही बलिदानाचा आशेत आहे
कारण आपण त्यांचे वंशज,भारतीय आहे
तारुण्याच्या या प्रवाहात आपणही पुण्य कमावू या
मिळाले सौभाग्य तर शहीदामधे आपलेही नाव लिहू या

श्रद्धा शि खानापूरकर

काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



श्रद्धा शि खानापूरकर
ठाणे

# आम्ही शूर सुपुत्र

या बाळांनो या रे या
"कौस्तुभ" सम शूर होऊ या //१//

हाती तिरंगा घेउनियां
निधडी छाती दाखवू या //२//

ढळेना इथला ध्रुवतारा
"अभिनंदन"सम भारत प्यारा //३//

गिरीमध्ये सुंदर लेणी
किल्ल्यांतुनि वीर कहाणी //४//

मंदिरे कृष्ण पाषाणी
ओठांवर मंजुळ गाणी //५//

रक्तात आमुच्या राणा शिवा
कृष्ण वाजवी गोकुळी पावा //६//

धन्य अमुचा चंद्रशेखर
धडा शिकवी शिरीषकुमार //७//

भाषा, प्रांत, धर्म अनेक
नवरस रंग अमुचे एक //८//

या तुम्ही हासत नाचत
सारे तंत्र -मंत्र जाणत //९//

घेऊ अवघे जग कवेत
साथीला टॅब संगणक //१०//

जरी प्रदेश असे भिन्न
तरी भारतीय आम्ही अभिन्न //११//

ऋण फेडू या भारत मातेचे
तिरंगा असे प्रतिक एकतेचे. //१२//

**सरोज सुरेश गाजरे**





कवयित्री



सरोज सुरेश गाजरे
भाईन्दर, ठाणे



काव्य
वृंदावन
ई-बुक साहित्य

कवी



**योगेश देवरे**
देवळाणा, जि औरंगाबाद (संभाजीनगर)

# वीर मातेचे वीर जवान

प्रेम प्रकरण करायचच ना..
तर या माय भूमी वर कर
शहिदांवर आणि सीमेवर
लढणाऱ्या सैनिकांवर कर...
जगताना कधीच बघत नाही
तो त्याची घरदार संपत्ती...
त्याच्यासमोर खरा प्रश्न
असतो ती फक्त आपलीच माती...
लढेल तो वीर जवान...
मरेल तो शहीद जवान..
कोणाच्या भाग्यात ते एवढं
तिरंगा कफनात तो जवान...
ही काळी आई ही..
रडत असेल त्याच्यासाठी...
ज्यावेळेस एक जवान शहीद होतो
या चिमुकल्या मातीसाठी....
आदर्श मानायचा आहे ना
एक वेळ सैनिक आदर्श ठेवून बघ..
यशाचे उंच शिखर सर कसं करायचं
जवानाकडे बघुन कळेल तुला...
कधी भेटलाच जवानांना
एक वेळेस मिठी मारून बघ..
जगणाऱ्या आयुष्याचं
एक फूल त्याला देऊन बघ....
आयुष्याची जिंकल्यासारखं वाटेल तुला...!!

✒ योगेश देवरे

# वीर जवान

माय भू तुझे रक्षण करण्या साठी
सिमेवरती मी सदैव लढतो
आलेल्या अतिरेक्यांच्या गोळया
खात धारातीर्थ मी पडतो

आमच्या रक्ताचे हे पाट वाहुनी
विजय देशाला या मिळवुन आम्ही देतो
साऱ्या जगाला आनंद देवुनी
जय जयकार आमचा सुध्दा होतो...

मरणाला आम्ही तयार असतो
विजय होण्याची असते आम्हा घाई
आमच्या येण्याच्या वाटेकडे डोळे लावून
वाट बघत असते आम्हा जवांनाची आई

देशाला वाचवण्यासाठी बनुन
राहतो  मी शत्रूचा या भक्षक
साऱ्या जगात माझी ख्याती
आहे मला म्हणतात सीमेवरचा रक्षक

माय भु तुझे रक्षण करताना
एक जवान म्हणुन घडलो
माते तुझी सेवा करत
मरताना विर जवान ठरलो..

✒ सिध्देश दिलीप उतेकर



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवी



सिध्देश दिलीप उतेकर
वावे तर्फे खेड जांभूळ वाडी

# वीरगती

वीरगती मिळाली मला
जन्माचे झाले सार्थ
पांग फेडून मायभूचे
जीवनात आला अर्थ//१//
शुर सरदार असे मी
भारत मातेचा लेक
प्राणाची बाजी लावून
देशसेवा केली नेक//२//
देशसेवेचे घेवून व्रत
नसानसात पेटली देशभक्ती
सळसळत्या रक्ताला नव्हती
कधी कुणाची तमा व भिती//३//
सीमारक्षणार्थ आई आज
लेक तुझा रक्तबंबाळ झाला
शत्रुसैन्याच्या चिंध्या चिंध्या
करुन आनंदाश्रूत न्हाला//४//
मातीत देह विरला आता
अंतरणार माय तुझी कुशी
अखेरचा दंडवत आता
मिळाली मज मातीची उशी//५//
नकोस होवू व्यथित आई
कौतूकाचा होईल सोहळा वीर
माता होण्याचे आई
भाग्य लागेल तुझा गळा//६//
मायभूच्या संरक्षणार्थ
पुन्हा पुन्हा जन्म घेईल
देवाजवळ मागणे मागून
तुझ्याच पोटी माय येईल//७//

✒ **सौ.मनिषा दिपक सामनेरकर**



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



**सौ.मनिषा दिपक सामनेरकर**
पालघर



# शूर माझा बाळ

पहीले स्वप्न तुझे, कदाचित गर्भातच पाहीलेले
देश रक्षणार्थ बलीदान ठरवलेले

कसे फुलवू स्वप्न तुझे, कसे देऊ आशिर्वाद तुला?
घाबरे मन करता विचार, चिंता वाटे मला.....

परी जिद्दी असे तू, गेलास देश- रक्षणार्थ
आश्वस्त केले मजला, सांगे परतेन मी; करून जीवा यथार्थ

तुटून पडतोस तू , बनून काळ देशाच्या शत्रूंवर
करतोस अभिषेक रक्ताच्या त्यांच्या, भूमातेच्या अश्रूंवर

हक्क नाही कधीच तुला, धारातीर्थी पडण्याचा
उडू दे थरकाप शत्रू गोटात, केवळ तुझ्या असण्याचा

कित्येक आशिर्वादांचे कवच घालते तुला, तरी मनात काहूर उठते शंकांचं
पाठ फिरते जेव्हा तुझी घराकडे, वादळ माजते लेकीच्या (सुनेच्या......) चिंतेचं

रोवतोस पाय युद्धभूमीवर, विरश्री संचारते तुझ्यात
एका बेसावध क्षणी, तुझ्या नावाची गोळी शिरते, छाताडात तुझ्या

तसेही तुझे असणे -नसणे सारखेच असायचे
'तिचं' पांढर कपाळ मात्र , संकेत तुझ्या कधी न परतण्याचे

तरीही कसे पचवायचे तुझे असे अचानक जाणे.....
मरणोत्तर सोहळयात तुझ्या, जीवनाचे गाणे...???

इमानेइतबारे कर्तव्य निभावून, साधलास तू परमार्थ
वचन निभावलेस परतण्याचे, करून जीवा...

सौ. अंजली उत्तरवार

काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



सौ. अंजली उत्तरवार
चंद्रपुर

# आठवतो पुलवामा हल्ला

दहशतवादी भ्याड हल्ला
काश्मीरच्या पुलवामा जिल्ह्यात
चाळीस जवान शहीद झाले
वीर मरण देशासाठी पत्करत

शत् शत् प्रणाम
अशा या वीर योद्धाना
सर्वोच्च बलिदानासाठी
सलाम त्यांच्या कुटुंबांना

वीर जवानांनी दिली धमकी
पुलवामा हल्लेखोर आतंकवादीना
लढून दाखवा समोर येऊन
हिम्मत आहे आम्हा सर्व जवानांना

काळजी नाही जीवाची
शत्रु हल्ली सतत करी
भारत भूमी हेच कुटुंब
ध्येय हेच मनी धरी

शौर्य , निर्धार , निष्ठा
मूर्तिमंत प्रतीक सैनिकांची
श्रद्धांजली वाहते
सर्व वीर पुरुषांची

सौ. रेखा बागुल





कवयित्री



सौ. रेखा बागुल
बोईसर, जि पालघर

# शहीद जवान

आई बाबा तुमच्या कर्तुत्वाला सलाम
स्वप्न खूप बघितले बाळा तुझ्यासाठी
पण देशासाठी लढताना देशवासीयांचे
रक्षण करताना पाहायचं होतं तुला
म्हणून लहानपणापासूनच तुझ्या
मनात देशवासीयांच्या रक्षणाच बीज
तुझ्या मनात रुजवल जसं पाहिजे
तसं झालंही तू केलं देशरक्षणाचे
स्वप्न साकार तुझ्यामुळे
आमच्या जीवनालाही मिळाला
वीर मातापिताचा आकार
वीर बनून झालास तु सैनिक
प्रत्येक क्षण करत होती देवाकडे
प्रार्थना सुखी ठेव देशरक्षण
करणाऱ्या सगळयाच आई बाबाच्या
बाळाला नको डगमगू देऊ आमचे मन
जेव्हा येत असतो प्रत्येक सण
येते बाळा तुझी खूप आठवण
घर परिवार लेकरं बाळा सोडून
गेलास तू खरा पण क्षणोक्षणी
उर दाटून येतो बाळा येत असतो
तुझी सारखी आठवण वीर मरण
पत्करून शहीद झालास तू खरा
सैनिक तुझ्या कर्तुत्वाला करतो
आम्ही सलाम वीर तुझे सलाम ..

✒ **सौ .सविता मुनोत**



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



**सौ .सविता मुनोत**
कुकाणा, जि. अहमदनगर



# वीरगती

लाल रक्त पाहताच
भिती मजला ही वाटे,
नको युद्ध कोणतेच
कंठ माझा ही दाटे।

बाबा गेले युद्धातच
वीरमरण हसत स्विकारले
देह त्यांचा तिंरग्यातला पाहता
मी सैनीक व्हायचे ठरवले।

आई हळवी माझी झाली
मात्र,अश्रू नयनात नाही....
बाबासारखाच शुर योद्धा तू
शत्रूचा फडशा पाडीत राही।

नसानसात वाहीले रक्त
सळसळ अंगात भरले....
चाल करून शत्रूस आम्ही
बंदूकीने पाणी पाजले।

मातेचा घेऊनी आशिर्वाद
लढाया मी ही निघालो
छातीवर झेलली गोळी
वीरगतीस  प्राप्त झालो।

ॲड. वर्षा जाधव

काव्य
वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



ॲड. वर्षा जाधव
कळमनुरी,हिंगोली

# 26/11 ची ती भयाण रात

मुंबई मायनगरीत 26/11 च्या
भयाण रातीला ती घटना घडली
पाहून अंदाधुंद गोळीबार तो
साऱ्यांचीच झोप उडाली

बंदुकी, स्फोटके घेऊन समुद्रा मार्गे
ते आले होते दहशतवादी नाग
तैनात नव्हते तेव्हा भारत भूमीची
रक्षा करणारे आपले शिवबांचे हे वाघ

एकाच क्षणात संपवले सारे त्यांनी
सारेच बनले ते ताजहल्याचे भक्षक
आपल्या आया- बहिणीचे वाचवाया प्राण
सिंहासारखे लढले स्वराज्याचे रक्षक

आठवणी त्या ठेऊन गेले देशप्रेमी सारे
जिजाऊच्या शिवबाचे ते होते मावळे
मृत्यमुखी पाडले ज्यांनी माणसांना
भामटे, निर्दही दिसायला होते ते सावळे

भारत मातेचा तो होता जवान
ज्याने त्या रातीला जीव आपला गमावला
आज वंदन करतो त्या माउलीला
आयुष्यात जिने असा पुत्र कमावला

सगळयाच जवानांना देऊन श्रद्धांजली
शान तिरंग्याची मनापासून राखतो
ऋण कसे फेडू या जवानांच्या कार्याचे
यांच्याठी माणुसकीची भीक मी आज मागतो

✒ **अक्षय चरण सितापुरे**





कवी



अक्षय चरण सितापुरे
अहमदनगर



काव्य
वृंदावन
ई-बुक साहित्य

कवी



कु. प्रशांत अशोकराव गोरे
ता.राहुरी जि.अहमदनगर

# वीर जवान

भारतवासीयांनो शिर झुकवून
विनम्रपणे टेकवू माथा
वीर जवानांना आदरांजली
देवून गावूया त्यांच्या गाथा....||
घरदार संसार सोडून
देशसेवेचे व्रते घेतली हाती
मायभूच्या संरक्षणासाठी
महत्त्वाची नव्हती नाती....||
प्राणाची पर्वा न करता
देशासाठी पडले धारातीर्थी
द-याखो-यातून गुंजते
त्यांच्या बलिदानाची कीर्ती....||
मायभू रक्षणार्थ झेलल्या
निधड्या छातीवर गोळ्या
रक्तबंबाळ होवूनिया हाणून
पडल्या शत्रुपक्षाच्या टोळ्या.....||
धारातीर्थी कोसळल्यावर
ललाटी लावती मातीचा टिळा
मायभूमीच्या सेवेत श्वास विरणार
म्हणून आनंदाश्रूनी भरुन येई गळा.....||
भारत मातेची सेवा करणे
हेच त्यांचे ध्येय असे
देशासाठी प्राणार्पण करणे
नसानसात भिनलेलं दिसे...||

कु.प्रशांत अशोकराव गोरे

# वीरगती

आम्हा वाटे अंधार पसरला
१४ फेब्रुवारची ही सकाळ
चिंधडया तुझ्या उडवल्या
टपून बसला काळ ॥१॥
जातधर्म सोडून देऊन
देशधर्म फक्त निभावतो
शहीद झाले देशासाठी
सर्वस्व  अर्पण करतो ॥२॥
खरे प्रेमवीर तर तुम्ही
रक्ताच्या सडयाने दिले
मातेला तुमचे बलिदान
मातेच्या कुशीत निजले ॥३॥
पुत्र ज्या माऊलीचे
शहीद झाले क्षणात
वेडीपिसी झाली आई
थरथरली ही भारतमाता ॥४॥
त्यांच्या चिंतेच्या ज्वालेने
वणवा देशात पेटले
सर्व भारतवासी हे
न्यायासाठी संतापून उठले ॥५॥
सुखाने रोज झोपत असतो
तुमच्यामुळे आम्ही घरात
तुम्ही सीमेवर जागे राहून
रक्षण आमचे करत असतात ॥६॥
सलामी देऊ सैनिकांना
श्रध्दांजली अर्पण करुन
सैनिकांच्या आत्माला
तेव्हाच शांती लाभेल ॥ ७॥

✒ **संगीता महाजन**



काव्य
वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



संगीता महाजन
जळगाव





# शहीद जवान

सीमेवरती लढतांना
त्याचा उद्देश मात्र एकच असतो,
प्राण गेले तरी फिकर नाही
तो त्याच्या मायभूमीच रक्षण करतो,
साम, दाम, दंड, भेद
तो ह्या संपूर्ण कोशल्याने निपुर्ण असतो,
आपल्या माय भूमीसाठी
तो आपला जीवही गहाण देतो,
वातावरण कसही असो
तो त्या वातावरणात स्वतःला समावून घेतो,
प्रतिकूल परिस्थितीत सुद्धा
तो आपल्या मायभूमीच रक्षण करतो,
त्या दूर अश्या गावी
एका झोपडीत त्याची आई असते,
आपल्या पोराचा एक संदेश तरी येईल
या आशेने ती वाटेत उभी असते,
आज अचानक लिहिता लिहिता
माझ्या समोर एका सैनिकाची आई आली,
म्हणते मला पोरा-
हे डोळं दिपलेत किरे त्या वाटेला पाहून
माझ पोरग काही दिसतं नाही,
कधीचा गेलेला रे तो
मी त्याला एक घास सुद्धा भरवलेला नाही,
दररोज माझ्या मांडीवर
डोकं ठेवून स्वप्न बघायचा तो,
मी पण सैनिक होईल हं आई
असच सांगत राहायचा तो,
खुल्या अश्या मैदानात
तो असा की पळत सुटायचा,
म्हणतो कसा- हेच माझं लक्ष आहे
१६०० मीटर गाठायचा,
पहिल्या भरतील हरला तो
दुसऱ्या भर्तीतही निराश झाला,



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवी



मयूर नारायण बागुल
उमराने जि.नाशिक

तिसऱ्या भरतीत मात्र
आर्मी ची वर्धिच घालून आला,
काय सांगू तुला पोरा
अशीच माझी छाती अभिमानान फुलली,
आज त्याच्या स्वर्गीय बापाची त्यानं
शेवटची इच्छा पूर्ण केली,
तेव्हा पासून गेलेला
फक्त एकदाच माझ्या भेटीला आला रे,
त्यानंतर कधी त्याचा
निरोपही नाही लागला रे,
आज खूप दिवसातून आर्मी मधून,
एक पत्र आलं की रे पोरा,
ह्या अडाणी आईला हे पत्र
वाचताही नाही आलं रे जरा,
खूप दिस झालीत त्याला
डोळं भरून पाहिलं नाही,
वाच की रे लेका जरा
ह्या पत्रात काय लिहून पाठवलंय त्यांनी,
ते पत्र वाचण्याइतपत
माझ्यात धाडस नव्हता,
ह्या मायभूमीन आपला
धाडसी वीर गमावला होता,
ते पत्र वाचतांना माझ्या डोळ्यांतले
अश्रूच थांबले नव्हते,
त्या भोळी आईला कस सांगावं
तिला पाहून माझे मन भारावले होते,
माझे ओले डोळे पाहून
तिलाही कदाचित कळालं असेल,
हळूच आपलं दुःख आवरत
तिने स्वतः ला धीर दिला असेल,
एका शाहिद जवानाची मात्र एवढीच
एक कहाणी असेल.......
एका शाहिद जवानाची मात्र एवढीच
एक कहाणी असेल.......

 **मयूर नारायण बागुल**

# सैनिकहो तुमच्यासाठी

सैनिकहो फक्त तुमच्यासाठी
मी उचलली लेखणी माझी
शौर्यगाथा लिहिण्या आता
सरावली ही लेखणी माझी

संसार सारा सोडून गेलात
तुम्ही रक्षण करण्या भुमातेचे
सीमेवरती लढता लढता मग
शहिद झाले हो जीवन तुमचे

तुमच्याच असण्यामुळे आम्ही
सारे घरादारात सुरक्षित होतो
तुमच्यामुळेच तर आमच्या घरी
दिवाळी,दसरा सण हसरा होतो

देशासाठी  प्राणपणाने
नेहमीच लढलात तुम्ही
भुमातेच्या कुशीत लहानचे
मोठे असे घडलात तुम्ही

तुमच्याविना घर नेहमी आता
सार सुनं सुनं दिसू लागेल
तुमच्या कार्याला आमचा
नेहमीच सलाम असेल

व्यर्थ न जावो वीर सैनिकहो
अनमोल हे तुमचे बलिदान
आहेत ते आमच्यासाठी
अमुल्य असे हे तुमचे प्राण

सैनिकहो तुमचे बलिदान
कधीच जानार नाही वाया
आम्ही करू प्रार्थना ईश्वराकडे
तुम्ही जन्म येथे पुन्हा घ्याया

✒ **सागर सदाशिव डवरी (प्रेमकवी)**



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य





# जवानांना मानवंदना

प्रत्येकाच्या मनी ध्यास
भारतीयाचा मान तू
हृदयात स्थान तुला
देशाचा रे सन्मान तू..
कष्टाची ही परिसिमा
करी देश संरक्षणा
मातेचा पुत्र तु उदार
देशाभिमान हा कणा..
शौर्यस्फूर्तीच्या कहाण्या
करिसी लढाया वीरा
कधी धर्तीवर उभा
कधी अवकाशी मारा
पर्वा जीवाची न कधी
त्या नामोहरम करी
मातृभूमी आशिर्वाद
आई वाट पाहे घरी..
जीवनी कर्तव्य साध्य
तुम्ही वारस वंशाचे
आम्हां लाभले राजस
दीप तुम्ही भारताचे...
सैनिकाचा आम्हां कीती
आदर मनात ध्यानी
जपा हीच स्वतंत्रता
जीवन मंत्र हा मनी...
सज्ज सैनिक जवान
शौर्य गाजवा जीवनी
प्रत्येकाचा अभिमान
स्वागतास ही अवनी..

सौ.रोहिणी टाकळकर जोशी

काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



सौ.रोहिणी टाकळकर जोशी

# लाल धरणी

प्रेम केलं मातृभूमीवर
निधड्या छातीच्या जवानांनी
ओलिचिंब धरणीची काया
देशभक्ताच्या रक्तांनी

गुलाब काय देता तुम्ही
प्राण त्यांनी अर्पिला
आहुती दिली बलिदानाची
देह तिरंग्यात लपेटलेला

आभाळाच्या छताखाली
धरतीची तुला कुस
निस्वार्थी तुझ्या देशप्रेमाला
काळानंच लावली फुस

उसणं राहीलं प्रेम तुझ्याकडं
तुझ्या चिमुकल्या पाडसाचं
शब्दांत नाही मावत वीरा
कौतुक तुझ्या धाडसाचं

✒ **सौ.अर्चना सुनिल घळके**





कवयित्री



**सौ.अर्चना सुनिल घळके**
बार्शी, सोलापूर





कवयित्री



सौ.दिपाली दिलीप पिंपळे
कुंभवली ता.जि.पालघर

# ढाल

सीमेवरती खडे पहारे
करती आपले जवान
त्यांना पाहून होई छाती चौडी
वाटे आम्हां अभिमान

रक्षणार्थ  देशबांधवांच्या
रात्रीचा ते दिवस करती
स्वतः झेलून संकटांना
मजबूत ढाल आमची बनती

वेळ येता बलिदानाची
जराशीही कुचराई ना करती
वेळ येता प्राणत्यागाची
क्षणभरही मागे ना सरती

वाळवंट वा बर्फ डोंगरी
तुम्हांस त्याची तमा नसे
देशरक्षण करणे एवढेच
सदैव तूमचे ध्येय असे

शपथ घेतो आज आम्ही
तूमची शहीद जवान
व्यर्थ जाऊ देणार नाही
तूमचे बलिदान महान

सौ. दिपाली दिलीप पिंपळे

# शहीद जवान

तैनात सीमेवर जवान,
देई नित्य खडा पहारा..
घेईल कवेत मृत्यूलाही,
भारतभूमी करील इशारा..

लाख दुश्मन मिळून येता,
खाली जाणार नाही मान..
इमान देशसेवा करण्याचे,
होणार नाही कधी बेईमान..

कवेत घेईल भारतमाता,
युद्धात शहीद झाल्यावर,
डोळे भरतील आभाळाचे,
वीर तिरंग्यात लपेटल्यावर..

चारली शत्रूला धूळ सदा,
युद्धप्रसंगात झुंजार वीर..
वंदन देशकार्याला करू,
हात जोडून झुकते शीर..

भारतभूमी आई मानावी,
मनोभावाने करावी पूजा..
जन्माने भारतीय आहोत,
नको मग जातपात दुजा..

✒ **प्रसादिक**



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य


कवी



**प्रसाद सु. धुमाळ**
वाई, सातारा

## आमच्या निवडक सेवा

**लोगो, बिझनेस कार्ड, लेटरहेड, एन्वलेप, सिडी कव्हर.**
**बॅनर, बॅकड्रॉप, पोस्टर, 3D प्रेझेंटेशन, इंटेरियर डिजाईन.**
**3D एलिव्हेशन, स्टेज डिजाईन, कॉरपोरेट प्रेझेंटेशन.**
**वेब डिजाईन, अल्बम डिजाईन, फोटो इडिटींग. vfx.**




**• संपुर्ण महाराष्ट्रभर सेवा उपलब्ध •**